उथळा बृहत लघु प्रकल्प,ता.शिरुर कासार,जि.बीड कालवा दुरुस्ती व कालव्यावरील बांधकामास अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२४/ (प्र.क्र.१८/२०२४)/सिंव्य(कामे)

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक :१५ मार्च २०२४

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र.जा.क्र.गोमपाविम- /सिंचन-२ / विवसू कडा लातूर / धा -३१/ ४८ दि ०१/०१/२०२४
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे) दि १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे), दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

उथळा बृहत लघु प्रकल्प ता. शिरूर कासार जि.बीड चे बांधकाम हे सन १९९२ मध्ये पूर्ण झाले आहे. धरणाची एकुण साठवण क्षमता ८.१७० द.ल.घ.मी. असून जीवंत साठवण क्षमता ७.५२१ द.ल.घ.मी. आहे. धरण ठिकाणी अक्षांश १९-०६-०० व रेखांश ७५-५२-०० आहे. धरणाची एकूण लांबी (सांडव्यासह) १६१५ मी. आहे. धरण सांडाव्याचे बांधकाम दगडी असून सांडाव्याची एकूण लांबी २८५ मी आहे. सदरील प्रकल्पास दोन मुख्य कालवे असून त्यांची वहनव्यय क्षमता डावा कालवा ०.८०० घमी /से व उजवा कालवा १.२०० घमी/से आहे तसेच उजवा कालवा हा १२.६० कि.मी लांब असून, डावा कालवा हा २.८८ कि.मी.लांब आहे, प्रकल्पाची सिंचन क्षमता ही १४८० हेक्टर असून या प्रकल्पाद्वारे आजपर्यंत ३८६.०० हे इतके महत्तम सिंचन क्षेत्र झाले आहे.

प्रकल्पाच्या डावा मुख्य कालव्यावरील विविध साखळी क्रमांकावर गळती होत असून तेथे संधानकीय अस्तरीकरण (Concrete lining), तसेच कालव्यावरील विविध बांधकामे हे पूर्णपणे नादुरुस्त असून त्यांची दुरुस्ती करणे आवश्यक आहे. सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर धरण भिंत सुस्थितीत येईल, तसेच कालव्याची वहन क्षमता मूळ संकल्पना नुसार पुनर्स्थापित होईल व बांधकामा मधून मोठ्या प्रमाणात होणारी पाण्याची गळती थांबेल व वाचलेल्या पाण्याचा उपयोग सिंचनासाठी करणे शक्य होईल.

तसेच प्रकल्पावरील १०९४ हे सिंचन क्षेत्र पुर्नस्थापित होणार आहे.

या पार्श्वभूमीवर उथळा बृहत लघु प्रकल्प,ता.शिरुर कासार,जि.बीड कामाचे अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत उथळा बृहत लघु प्रकल्प,ता.शिरुरकासार,जि.बीड कामाचे अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत रू ९९,६३,७२३/- (रू. नव्यान्नव लक्ष त्रे**सष्ट** हजार सातशे तेवीस **पंधरा** फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता , निविदा प्रक्रिया , कामाचे नियोजन व पूर्णत्व , प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

५) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापन करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपुर्ण जबाबदारी क्षेत्रिय अधिका-यांची राहील.

६) प्रस्तावित दुरस्तीकामांद्वारे अंदाजे १०९४ हेक्टर सिंचन क्षेत्र पुनर्स्थापित करण्याची जबाबदारी क्षेत्रिय अधिकारी यांची राहील.

७) सदर कामास नियामक मंडळाच्या बैठकीत मंजूरी प्राप्त झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात न करण्याची जबाबदारी सबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (००)(१४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (मराठवाडा विभाग) (कार्यक्रम) (४७०२ ७४४३) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. - ५९ सन २०२३-२४ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावरwww.maharashtra.gov.inउपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०३१५१७०५५३९४२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.03.15 17:15:04 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाच्या उपसचिव**

सोबत सहपत्र -:

प्रत:-

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री (जलसपंदा/ वित्त) यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा. उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
९) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) अमुस (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१५) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर
१६) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक ,लाभक्षेत्र विकास ,जलसंपदा विभाग , छत्रपती संभाजीनगर
१७) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१८) अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,बीड
१९) कार्यकारी अभियंता,जायकवाडी पाटबंधारे विभाग क्र ३ ,बीड.
२०) सिं.व्य. (कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२४/ (प्र.क्र.१८/२०२४)/ सिंव्य (कामे),**

**दि. १५/ ३ / २०२४ चे सहपत्र**

| **Sr.No.** | **Description of Item** | **Amount in ( Rs. )** |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | |
| | A)Repairs of Dam Top and Stone Pitching | 152746 |
| | B) Repairs of canal lining and structure | 7501101 |
| 2 | Total Work Cost | 7653847 |
| 3 | Royalty | 630746 |
| 4 | 1 % Insurance | 71823 |
| 5 | 18 % GST | 1377692 |
| 6 | 3% Contingenious | 229615 |
| | **Total Rs.** | 9963723 |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.03.15 17:15:23 +05'30'

**(न. गौ. बसेर)**
**शासनाच्या उपसचिव**